GR-200407071229050001-0107 **प्रकल्पग्रस्त अथवा त्यांच्यावर अवलंबून असणा-या व्यक्ती यांना शासकीय सेवेतील गट क आणि गट ड मधील पदांवर नियुक्ती देण्याबाबत अनुसरावयाची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक:प्रकल्प-१०००/प्र.क्र.२७/२०००/१६-अ,**

**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.**

**दिनांक :- १३ सप्टेंबर, २०००.**

संदर्भ :- १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एईएम-१०८०/३५/१६-अ, दि.२१ जानेवारी,८०

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:प्रानिमं-१२९०/प्र.क्र.३८/९०/१३-अ, दि.१८ जून,९०

३) शासन परिपत्रक,महसूल व वन विभाग,क्रमांक आरपीए-१०९३/प्र.क्र.१३९/र-१, दि.२२ सप्टेंबर,१९९३.

४) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:एसआरव्ही-१०९४/१००४/प्र.क्र.३०/१६-अ,दि.१७.११.९४

५) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:प्रानिमं-१२९६/प्र.क्र.१४९/१६/१३-अ, दिनांक ३ जानेवारी,९७

**शासन परिपत्रक**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक-१ अनुसार, प्रकल्पग्रस्त व्यक्ती व त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती यांना शासन सेवा व शासन पुरस्कृत महामंडळे, शासनाकडून सहाय्य मिळणारी महामंडळे,शासनाने चालविलेल्या संस्था,जिल्हा परिषदा, महानगरपालिका,नगरपालिका,आणि ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार शासनाला आहे अशी इतर सर्व प्राधिकरणे, सेवा व संस्था यांच्या आस्थापनेवरील गट क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या अखत्यारितील पदे वगळून) आणि गट ड मधील पदांवरील नेमणूकांसाठी एकूण जागांच्या किमान ५% पर्यन्त सर्वोच्च प्राथम्यक्रम देण्यात आला आहे. संदर्भाधीन क्रमांक ३ च्या शासन परिपत्रकान्वये प्रकल्पग्रस्तांच्या नियुक्ती संबंधात कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्रमांक ५ अनुसार प्रकल्पग्रस्त व्यक्तींनी प्राथम्यक्रम असलेल्या या ५% पदांसाठी नियुक्ती प्राधिका-यांकडे परस्पर अर्ज करणे आवश्यक आहे.

२. प्रकल्पग्रस्त किंवा त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती यांना शासकीय सेवेत गट क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या अखत्यारितील पदे वगळून) व गट ड मधील पदांवर नियुक्ती देण्याचे अधिकार नियुक्ती प्राधिका-यांना असल्यामुळे या संबंधात जिल्हाधिकारी यांच्याकडे असलेल्या प्रकल्पग्रस्तांच्या प्रतिक्षा यादीतील ज्येष्ठतेनुसार नियुक्त्या दिल्या जात नाहीत, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे संदर्भीत शासन निर्णयांमध्ये अंशतः बदल करुन जिल्हाधिकारी आणि नियुक्ती प्राधिकारी यांना खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१) जिल्हाधिकारी यांनी प्रकल्पग्रस्त उमेदवारांची प्रतिक्षा यादी तयार करताना प्रकल्पग्रस्तांनी सादर केलेल्या प्रथम अर्जाच्या दिनांकानुसार जेष्ठता ठरवावी व त्यासाठी एक नोंदणी रजिस्टर ठेवावे.

(कृ. मा. प)

शामुमु-रोटा-साप्रवि-एच-879(4500-9-2000)

२) यापुढे नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी प्रकल्पग्रस्त उमेदवाराच्या परस्पर नियुक्त्या करु नयेत. सर्व नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे रिक्त असलेल्या पदांपैकी प्रकल्पग्रस्तांमधून भरावयाच्या पदांसाठी मागासवर्गीयांच्या आरक्षणाला बाधा येणार नाही, याची दक्षता घेवून संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे असलेल्या प्रकल्पग्रस्तांच्या प्रतिक्षा यादीतील उमेदवाराची मागणी पदांच्या सेवा प्रवेश नियमानुसार करावी.

३) जिल्हाधिकारी कार्यालयाने वरील सूचना क्र.२ नुसार प्रकल्पग्रस्त उमेदवारांच्या यादीतून आवश्यक उमेदवारांची जेष्ठतेनुसार शिफारस संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांना करावी.

४) नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी प्रकल्पग्रस्तांना नियुक्ती दिल्यानंतर त्याप्रमाणे जिल्हाधिकारी कार्यालयास कळवावे व संबंधित जिल्हाधिकारी यांनी या उमेदवारांची नावे प्रतिक्षायादीतून वगळावीत.

३. नियुक्ती प्राधिकारी आणि जिल्हाधिकारी यांनी जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांच्या प्रतिक्षा यादीनुसार व सेवाप्रवेश नियमानुसार पात्र असलेल्या प्रकल्पग्रस्त उमेदवारांना नियुक्ती देण्याबाबत वरील सूचनांनुसार कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

दद्‌ा.देशपांडे

**( द. दा. देशपांडे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव.
४) सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) मुख्य सचिव.
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव.
* ७) प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई.
* ८) प्रबंधक,उच्च न्यायालय,अपिल शाखा,मुंबई.
* ९) प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई.
* १०) प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त,मुंबई.
* ११)सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई.
* १२) सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
* १३) सचिव,राज्य निवडणूक आयोग,मुंबई.
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी/ जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) संचालक ,समाजकल्याण पुणे.
१७) आयुक्त,आदिवासी विकास ,नाशिक.
१८) संचालक,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे.
१९) संचालक,सेवायोजन,मुंबई
२०) सहायक आयुक्त,(मागासवर्ग कक्ष),सर्व विभागीय आयुक्तांची कार्यालये.
२१) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख.
२३) सर्व मंत्रालयीन विभाग.
२४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
२५) निवड नस्ती.

* (पत्राने)